# इस्लामचा शैक्षणिक दृष्टिकोन

लेखक : प्रा. खुर्शीद अहमद
भाषांतर : झाहिद आबिद खान



*"अल्लाह असीम कृपावंत व दयावंतच्या नावाने"*

शिक्षणाला इस्लाम धर्मात महत्त्वाचे स्थान प्राप्त आहे. मानवी इतिहासात केवळ इस्लाम परिपूर्ण ज्ञानाच्या स्वरूपात अवतरला आहे व त्याच्या अवतरणानेच ज्ञानाचे क्रांतिकारक वातावरण सर्वत्र पसरले आहे. इस्लामी दृष्टिकोनानुसार मानवी जीवनाची सुरुवात अज्ञानाच्या तिमिरातून झालेली नसून ज्ञानाच्या प्रकाशातून झाली आहे. आदम (अ.) यांच्या निर्मितीनंतर निर्मात्याने प्रथम मानवास जगातील विविध वस्तूंचे ज्ञान प्रदान केले. वस्तूंच्या ज्ञानामुळेच मनुष्य इतर प्राण्यांपेक्षा वेगळा सिध्द झाला व कुरआनच्या आज्ञेनुसार त्याला जगातील अन्य प्राण्यांवर वर्चस्व प्राप्त झाले. ज्ञानाच्या आधाराने सांस्कृतिक प्रगती व प्रभावी सामाजिक गौरव प्राप्त करता येते. जगातील इतर समाज व्यवस्थांनी ज्ञानास अनेक गरजांपैकी एक गरज मानले आहे, मात्र इस्लामने ज्ञानास केवळ गरज न मानता जीवनाची सर्वोत्तम गरज मानले आहे. इस्लामेतर कोणत्याच धर्माने ज्ञानार्जनास मौलिक गरज मानलेले नाही. ग्रीस व चीनने ज्ञान व सांस्कृतिक क्षेत्रात असामान्य प्रगती केली होती मात्र तेही आम जनतेला ज्ञानापासून वंचित ठेवत असत. उलट समाज मूठभर ज्ञानी लोकांच्यावर अवलंबून राहत असे. इस्लाम एकमेव धर्म आहे ज्याने सर्व मानवांकरिता शिक्षण अनिवार्य केले आहे व हे (शिक्षण देण्याचे) कर्तव्य पूर्णत्वास नेण्याची जबाबदारी संपूर्ण समाजावर लागू केली आहे.

प्रेषित मुहम्मद (स.) यांना प्राप्त झालेल्या प्रथम ईशवाणी (वही) ने ज्ञानाचे स्थान व त्याच्या महत्त्वाची जाणीव करून दिली आहे. त्यात केवळ ज्ञान व शिक्षणाच्या महत्त्वाची जाणीव करून दिली नसून लिहिण्या-वाचण्याकडेही इशारा केला आहे.

"वाच, ईश्वराच्या नावाने ज्याने निर्माण केले आहे. ज्याने रक्ताच्या गाठीपासून मानवाची निर्मिती केली. तुझा पालनकर्ता उदार आहे. ज्याने लेखणीद्वारे ज्ञान दिले. मानवाला वस्तूंची माहिती दिली ज्याचे त्याला ज्ञान नव्हते." *(कुरआन सूरह अलक ९६-१)*

कुरआनात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर कुरआनचे पठण करणे, कुरआनचे शिक्षण व तत्त्वज्ञान स्पष्ट करणे, अल्लाहच्या आदेश व आज्ञांचे पालन करणे, संयम बाळगणे व इस्लामचा प्रचार व प्रसार करणे या महत्त्वाच्या कर्तव्यांची पूर्तता करण्याची जबाबदारी सोपविण्यात आली होती. म्हणूनच प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"मला शिक्षक म्हणून पाठविण्यात आले आहे."

## शिक्षण म्हणजे काय?

ज्ञान व शिक्षणाचे महत्त्व दृष्टिक्षेपात ठेवून शिक्षणपध्दत व तिच्या तंतोतंत अंमलबजावणीचा योग्य मार्ग समजून घेणे आवश्यक आहे.

शिक्षणास केवळ सार्वजनिक स्वरूप दिल्याने उद्देशपूर्ती होत नाही. शिक्षण असे कार्य आहे ज्याद्वारे समाजास स्वत:ची ओळख निर्माण करता येते. शिक्षणाद्वारे प्राप्त ज्ञानाने समाजाचे नेतृत्व करणाऱ्या लोकांत उत्साह व क्षमता जागृत होते. नव्या पिढीला जीवन जगण्याचा योग्य मार्ग प्राप्त होतो व त्यांना जीवनाचा उद्देश व आपल्या कर्तव्यांची जाणीव प्राप्त होते. शिक्षणानेच समाज आपला सांस्कृतिक व वैचारिक वारसा भावी पिढीपर्यंत पोहचवू शकतो. शिक्षणामुळेच लोकांमध्ये आपल्या जीवनाच्या उद्देशाबद्दल आपुलकी निर्माण होते. शिक्षण बौध्दिक, शारीरिक व नैतिक पात्रतेस जोम देते. सुशिक्षित स्त्री-पुरुष उच्च विचारांनी प्रेरित सुसंस्कृत समाज निर्माण करतात व असा जनसमूह आपली सामाजिक कर्तव्ये योग्यरित्या पार पाडण्यास सक्षम होतो. गत काळातील शिक्षण तज्ञांनी शिक्षणाबाबत हेच मत व्यक्त केले आहे.

शब्दकोषानुसार शिक्षण (अर्थात ताअलीम) चा अर्थ 'प्राप्त करणे' असा होतो. 'ताअलीम'चा अर्थ 'पुन्हा पुन्हा भरपूर प्रमाणांत देणे' असा होतो. उद्देश असा की विद्यार्थ्याच्या बुध्दीवर त्याचा खोलवर परिणाम घडून यावा.

इंग्रजी शब्द Education लॅटिन शब्द Edex (अर्थात काढणे) व DUCER DUC (अर्थात मार्गदर्शन) पासून तयार झाला आहे. म्हणजे याचा शाब्दिक अर्थ 'माहिती गोळा करणे' व 'सुप्त संवेदनाना जागृत करणे' असा होतो. सारांश Education या शब्दाचा अर्थ 'माहिती गोळा करून विद्यार्थ्याच्या सुप्त संवेदनांना जागृत करणे' असा होतो.

जॉन स्टुअर्ट यांनी Education (शिक्षण) या शब्दाचा सविस्तर अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांचे म्हणणे आहे, "शिक्षण म्हणजे केवळ आपल्या उद्देशांच्या पूर्तीसाठी स्वत:च्या स्वाभाविक, बौध्दिक क्षमतेच्या आधारे आपण स्वत: किंवा इतर लोकांच्या सहायतेने आपल्याकरिता सीमित ज्ञानक्षेत्र निर्माण करणे असा अर्थ नसून शिक्षणाचे कार्यक्षेत्र अत्यंत विशाल आहे. मानवी चरित्र व त्याच्या क्षमतेवर पडणाऱ्या परिणामांचाही शिक्षणव्यवस्थेत समावेश होतो व त्या परिणामांचा उद्देश अगदी वेगळा असतो.

जॉन मिल्टन म्हणतात,

"माझ्या मते तेच शिक्षण खऱ्या अर्थाने परिपूर्ण व स्वागतार्ह असू शकते ज्याच्या आधारे मनुष्य आपल्या स्वत:च्या वा समाजाच्या कर्तव्यांचे प्रामाणिकपणे, कौशल्याने गौरवपूर्णरित्या पार पाडण्यास समर्थ होतो."

अमेरिकी विद्वान ड्यूमी यांच्या मतानुसार, शिक्षण मूळत: व्यक्तीच्या बौध्दिक व

भावनात्मक घडामोडींना स्वरूप देण्याची प्रक्रिया आहे.

डॉक्टर पार्क यांच्या विचारानुसार शिक्षण हे मार्गदर्शन व अध्ययणाद्वारे प्राप्त होणारे व त्यानुसार आचरण करण्याची सवय लावून घेण्याची कला आहे. थोडक्यात शिक्षण अशी अविरत प्रक्रिया आहे ज्याद्वारे नव्या पिढीची नैतिक, बौध्दिक व शारीरिक जडणघडण होत असते व त्यातूनच ते आपले वैचारिक, सांस्कृतिक व नैतिक बळ प्राप्त करतात. शिक्षणतज्ञ या शब्दाचे दोन अर्थ लावतात.

या शब्दाचा विस्तारित अर्थ असा आहे की व्यक्तीच्या शारीरिक, मानसिक, नैतिक व सामूहिक भावनांवर जे एकत्रित परिणाम घडून येतात त्यास शिक्षण समजावे. संक्षिप्त अर्थ असा की शाळा व कॉलेजात शिक्षकांमार्फत मिळालेल्या माहितीने मानवी मनावर जे परिणाम घडून येतात त्यास शिक्षण मानावे.

सारांश, शिक्षण ही अत्यंत महत्त्वपूर्ण बाब आहे व तिचा विद्यार्थ्यांच्या जीवनावर खोलवर परिणाम घडून येतो. खरे सांगायचे म्हणजे मानवी समाजाचे अस्तित्व शिक्षणावर आधारित आहे. चीनी भाषेत एक अत्यंत मार्मिक उपदेश आहे.

''तुमची योजना जर केवळ एका वर्षापुरती असेल तर शेती करा दहा वर्षांची असेल तर वृक्षारोपण करा व अनंतकालीन असेल तर माणसे तयार करा.''

निश्चितच, मनुष्य शिक्षणानेच चारित्र्यसंपन्न होऊ शकतो.

## शिक्षणाबाबतच्या गैरसमजुतीचे निरसन

शिक्षण एका विशिष्ट समाजाच्या संस्कृती वा तत्त्वज्ञानांशी निगडित असते. त्याशिवाय कोणत्याच समाजाच्या शिक्षणपध्दतीत स्वभाविकता, सार्थकता व विषयाला परिणामकारक स्वरूप प्राप्त होऊच शकत नाही. मात्र आधुनिक युगात स्वच्छंदता व व्यक्तिवादाच्या पुरस्कर्त्यांनी शैक्षणिक क्षेत्रात असा गैरसमज निर्माण केला आहे की शिक्षण, संस्कृती व योग्यायोग्य वगैरे बाबींचा विचार न करता सर्वसामान्य शारीरिक शिक्षणाप्रमाणे प्राप्त करता येते. या चुकीच्या धारणेच्या आधारे शिक्षणाला धर्म व नैतिकतेशी विभक्त करण्यात आले आहे व सांगण्यात येते की विद्यार्थ्याला आपल्या योग्यतेप्रमाणे प्रगती करण्यासाठी संपूर्ण स्वातंत्र्य द्यायला हवे. त्याचे भवितव्य घडविताना त्याच्यावर इतरांकडून कोणतेही दडपण निर्माण करता कामा नये. ही शैक्षणिक पध्दत अमेरिकेत प्रचलित झाली आहे व इतर पाश्चात्य देशांत हीच विचारधारा जोर धरत आहे. मात्र हे आमच्या निदर्शनास आले आहे की निरुद्देश शिक्षणाचे परिणाम उत्साहजनक सिध्द होऊ शकत नाही.

## श्रध्दाहीन शिक्षणाचे परिणाम

आपण उद्देशहीन व स्वच्छंद शिक्षणाचे बारकाईने निरीक्षण केल्यास खालीलप्रमाणे दोष आढळून येतील.

अ) 'श्रध्दाहीन' शिक्षणाने विद्यार्थ्यांमध्ये सामूहिक भावनेचा अभाव दिसून येतो. सामूहिक भावनेच्या अभावाने त्याग व तपस्येची मात्रा ओसरते व अशा शिक्षणाने सामाजिक जीवनावरील पकड शिथिल होत जाते. जे लोक सामूहिक उत्कर्षाच्या भावनेपासून दुरावले जातात ते उच्चाकांक्षेकरिता जीवन अर्पित करीत नाहीत. असे लोक जगात कधी कोणतेच महान कार्य पूर्णत्वास नेऊ शकत नाहीत. स्वत:च्या अस्तित्वाला कायम राखू शकत नाही. इतिहास या तत्त्वास साक्ष आहे की ज्या समाजाने उद्देशहीन जीवन व्यतीत केले आहे तो नामशेष झाले आहे.

ब) श्रध्दाहीन (उद्देशहीन) शिक्षणाने नव्या पिढीत नैतिक बळ कधीच उंचावले जात नाही. त्याचे संबंध केवळ बौध्दिक गरजांशी असते. त्यांना भावनांशी काही देणे घेणे नसते. भावनिक संवेदनांशी त्या शिक्षणाचा काहीच संबंध नसतो. दोन्ही प्रकारच्या शिक्षणाची दिशा एकमेकांच्या विरुध्द असते. त्यामुळे भयंकर सामाजिक क्षति घडून येते. खरे सांगायचे म्हणजे जोवर शिक्षणाचा हृदयाशी संबंध नसतो तोवर ते माणसाचे खरे मित्र व मार्गदर्शक होऊ शकत नाही. केवळ शारीरिक सुखांच्या नादात गुरफटला गेलेला माणूस सापाहून अधिक विषारी होतो.

क) उद्देशहीन शिक्षणाकडे कल असल्याने एकूण ज्ञान विखुरले जाते व ते रचनात्मक व एका केंद्रबिंदूवर स्थिर राहू शकत नाही. विद्यार्थी स्वत:च्या जीवनास सभोवतालच्या परिस्थितीशी सलग्न न राखता ज्ञान व जीवनाला एकजीव होऊ देत नाही.

ड) अंतिम मुद्दा असा की उद्देशहीन जीवनामुळे असे लोक निर्माण होतात ज्यांचा जीवनाच्या जिवंत समस्यांशी कोणताच संबंध राहत नाही. त्यांचे व्यावहारिक जीवन पूर्णत: पोकळ सिध्द होते. त्यांच्यातील सामाजिक दृष्टिकोन नष्टप्राय होतो. डॉ. एडिवेटने अमेरिकी शिक्षणाबाबत म्हटले आहे, "उद्देशहीन तंत्रज्ञान व साधनसामुग्री मनुष्यास साहित्य, तत्त्वज्ञान, इतिहास व धर्माच्या सखोल अध्ययनापासून वंचित करीत आहे.

नामांकित लेखक वॉल्टर लिप्मैन यांनी एका भाषणात म्हटले होते,

"शाळा व कॉलेजातून निघालेल्या विद्यार्थ्यांना ज्या समाजात वावरायचे आहे

त्याबाबत त्यांना आत्मियता नसते. आपल्या सामाजिक परंपराशी अपरिचित, मात्र पाश्चात्य संस्कृतीशी समरस झालेले युवा-युवती भविष्यात होणाऱ्या दुष्परिणामांबाबत निश्चिंत आहेत. जर हीच परिस्थिती अबाधित राहिली तर संपूर्ण पाश्चात्य संस्कृती नष्ट होईल व तसे चित्र हळूहळू उमटू लागले आहे.

अमेरिकी शिक्षणपध्दतीबाबत रॉकफीलर यांचे असेच मत आहे. ते म्हणतात,

''विद्यार्थ्यांना जीवनाचा काहीतरी उद्देश जाणून घ्यायची इच्छा असते. जर त्यांना शिक्षणाने जीवनाचा खरा अर्थ व उद्देशच प्राप्त होत नसेल तर ते निरर्थक व दिशाहीन जीवनशैली स्वीकारण्यास मोकळे होतील.''

सर वॉल्टर मोबरे यांनी आपले पुस्तक 'विश्वविद्यालयातील वादळ' यात ब्रिटीश शिक्षणपध्दतीबाबत म्हटले आहे,

''आमच्या विश्वविद्यालयातून बाहेर पडलेले बरेच विद्यार्थी जीवनाच्या खऱ्या व महत्त्वपूर्ण समस्याबाबत गंभीरपणे विचारच करीत नाहीत. दिशाहीन शिक्षणाच्या दडपणामुळे ते सामाजिक व राजकीय वातावरणाबाबत उदासीन होतात व त्याबाबत जरासुध्दा गांभीर्य दर्शवीत नाहीत. परिणामत: ते धर्मनिरपेक्ष होतात. कारण शिक्षणाच्या विविध क्षेत्रांत मिळालेल्या ज्ञानाने जीवनाबाबतचे लक्ष्य निश्चित करण्याची क्षमता त्यांच्यात निर्माण होऊच शकत नाही व त्यामुळे ते शिक्षित होऊनही अकार्यक्षम राहतात.

शिक्षणाबाबत सखोल अध्ययनांति प्रा. हेराल्ड एच टेटस लिहितात,

''शिक्षणव्यवस्थेने आपल्या गतकालीन शिक्षणाच्या वैभवापासून स्वत:स अलिप्त करून घेतले आहे. मात्र गतकालीन शिक्षणाला योग्य असा पर्याय देण्यास ती असमर्थ ठरली आहे. परिणामत: सुशिक्षित पिढी श्रध्दा व विश्वासापासून वंचित असल्यामुळे जीवनाच्या मूल्यांचे संरक्षण करण्यास असमर्थ सिध्द होत आहे.''

उपरोक्त चर्चेवरून लक्षात येते की पाश्चात्य दिशाहीन व निरपेक्ष शिक्षणाचा ऱ्हास होऊ लागला आहे आणि शिक्षणतज्ञ व विद्वान मंडळींना चिंता भेडसावू लागली आहे की संस्कृतीचे जतन व समाजोन्नतीच्या दृष्टीने प्रचलित ज्ञानव्यवस्था किती उपयोगी होऊ शकेल?

## इस्लामी शिक्षणपध्दत

### अ) ज्ञानाची परिभाषा

इस्लामनुसार अल्लाह ज्ञानाचा स्त्रोत आहे. सर्व (जीव-निर्जीव) वस्तूंचे ज्ञान अल्लाहनेच दिले आहे आणि मानवाला ज्ञान व मार्गदर्शन त्यानेच दिले आहे. संवेदना, बुध्दी व अनुभव हे ज्ञानप्राप्तीचे मार्ग व स्त्रोत आहेत तरी 'वही' (ईशवाणी) सर्वोच्च ज्ञानाचा स्त्रोत आहे. अर्थात ज्ञान केवळ जीवनाच्या प्रयत्नावर अवलंबून नसून ते जीवनाच्या उद्देशांशी संलग्न आहे.

खरे पाहता मानवी प्रयत्न ध्येयाने प्रेरित असतात. याच तत्त्वावर इस्लामी शिक्षणव्यवस्था कायम करण्यात आली आहे.

इस्लामने ज्ञान व आचरण दोहोंस समान महत्त्व दिले आहे. दोहोंना एकमेकांपासून विभक्त केलेले नाही. पुस्तकी शिक्षण व चातुर्य आणि चारित्र्याचे पावित्र्य या दोहोंना एकत्र ठेवण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. इस्लामने शिक्षण व चारित्र्यनिर्मितीला एकाच नाण्याच्या दोन बाजूंएवढी जवळीक दिली आहे.

### ब) शिक्षणाचा उद्देश

शिक्षण म्हणजे ध्येयपूर्ती नव्हे शिक्षण ध्येयपूर्तीचा एक मार्ग आहे. सामाजिक संस्कृती व तिच्या उत्कर्षाची समर्पक जीवनशैली स्थापित करणे खरे ध्येय मानायला हवे.

ए. एन. व्हाईटहेड यांनी म्हटले आहे, धार्मिकता शिक्षणाचा आत्मा आहे.

डॉ. इकबाल यांच्या मतानुसार, इस्लामला आपल्या जीवन व शिक्षणाचा उद्देश मानायला हवा. त्यांनी ख्वाजा गुलाम सय्यदेनाला लिहिलेल्या पत्रात म्हटले आहे, ''माझ्या मते शिक्षणाचा पाया संवेदनांवर आधारित असायला हवा. मी शिक्षण या शब्दाचा याच अर्थाने उपयोग केला आहे. अशा प्रकारच्या शिक्षणाने 'स्वाभाविक शक्ती प्राप्त होते व त्यास धर्माच्या अधीन राहिले पाहिजे नाही तर ते दिशाभूल करणारे ठरेल. मुस्लिमांनी ज्ञानास मुस्लिम (शरणागत) राहू द्यायला हवे.

शिक्षण जर पूर्णत: धर्माधीन झाले तर ते निश्चितच ईश्वरीय वरदान सिध्द होईल.''

थोडक्यात शिक्षणाद्वारे विद्यार्थ्यांना सर्वप्रथम इस्लामचे ज्ञान देऊन जीवनाबाबतचा दृष्टिकोन अवगत करून द्यायला हवा. अर्थात त्याला जगात मानवाचे स्थान, अल्लाहचे एकत्व (अर्थात एकेश्वरवाद), प्रेषित्व, मरणोपरांत जीवन, वैयक्तिक व सामाजिक जीवनावर त्यांचे परिणाम, नैतिकतेचा इस्लामी समाजाच्या संस्कृतीवर होणारे परिणाम, मुस्लिमांची कर्तव्ये व त्यांच्या जीवनाचे उद्देश वगैरे बाबीचे ज्ञान शिक्षणाद्वारे घ्यायला हवे. उच्च ध्येयासाठी आपल्या सामर्थ्याचा कसा उपयोग करावा याबाबत त्याला शिक्षित करणे आवश्यक आहे. शिक्षणाद्वारे अशा व्यक्तींची निर्मिती व्हायला हवी ज्यांची इस्लामवर असीम श्रध्दा राहील व त्यांच्या स्वभावात इस्लाम असा भिनला गेला पाहिजे की जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात तो इस्लामी शिकवणीच्या आधाराने जीवनाचा मार्ग शोधून काढण्यास समर्थ झाला पाहिजे.

कुरआनात म्हटले आहे की विद्वान लोक सत्याची साक्ष देतात. ज्ञानी तेच होऊ शकतील जे इस्लामी ज्ञानास प्राथमिकता देतील. कुरआनात उल्लेख आहे की,

''अल्लाह स्वत: साक्ष देतो की अल्लाहशिवाय इतर कोणीही आराध्य नाही व विद्वान लोकच (या सत्याचे) साक्षीदार आहेत.'' *(कुरआन : आले इम्रान - १८)*

प्रेषित मुहम्मद (स.) यांचे कथन आहे,

"जे लोक ज्ञानी व अल्लाहच्या मार्गावर प्रयत्नशील (जिहादी) आहेत ते प्रेषित्वाच्या अगदी जवळ आहेत. ज्ञानी प्रेषितांचा संदेश लोकांपर्यंत पोहचवितात व ते प्रेषितांनी स्थापित केलेले कायदे (शरियत) तलवारीच्या आधाराने अंमलात आणतात."

प्रश्न असा निर्माण होतो की प्रेषितांचे आगमन का झाले होते? त्यांच्या आगमनाने ज्ञानी लोकांना प्रेषित्वाचे सान्निध्य प्राप्त झाले. कुरआननुसार, "इस्लामच्या प्रचार व प्रसाराने संतुलित व न्यायपूर्ण समाजाची निर्मिती झाली."

कुरआनने म्हटले आहे,

"त्यानेच (अल्लाहनेच) निरक्षरांमध्ये त्यांच्याचपैकी (मुहम्मद स.) यांना प्रेषित म्हणून पाठविले व ते कुरआनच्या आयतीचे (श्लोकांचे) पठण करून त्यांना पावन करतात व (अल्लाहच्या) ग्रंथाचे शिक्षण व ज्ञान देतात. त्यापूर्वी लोक अज्ञानामुळे पूर्णतः दिशाहीन झाले होते." *(सूरह जुमुआ - २०)*

"आम्ही प्रेषितांना ठळक खुणा (पुराव्या) सह पाठविले आहे व त्यांना ग्रंथ व तुळा (न्याय) दिले आहे जेणेकरून लोकांनी संतुलित (न्यायपूर्ण) जीवन जगावे." *(अलहदीद २५)*

इस्लामी संस्कृती व उन्नतीच्या पार्श्वभूमीवर लोकांना प्रेषित्वासमान कर्तव्यांची पूर्तता करणे व या योजनेचे व उद्देशांचे शिक्षण देणे, त्यांच्यात धर्माबावत जागृकता निर्माण करणे व त्यांना परिपूर्ण सशक्त जीवनशैली प्रदान करणे शिक्षणाचे मूलभूत उद्देश आहे.

हा उद्देश, शिक्षणाच्या प्रत्येक क्षेत्रात इस्लामी जीवनपध्दतीचा संदेश समाविष्ट केल्याने यशस्वी होऊ शकेल. नव्या पुस्तकांची निवड व रचना याच प्रकारे करायला हवी. याकरिता नव्याने प्रयत्न सुरु करून पोषक वातावरण निर्मिती करायला हवी.

## क) व्यक्ती व समाजाचे संतुलन

शिक्षणाचा प्रथमोद्देश आहे विद्यार्थ्यांमध्ये व्यक्तिमत्त्वाच्या विकासाची इच्छा निर्माण करणे. याबाबत परस्परविरोधी दृष्टिकोन दिसून येतील. काहीच्या मते व्यक्तीचा विकास सर्वात महत्त्वाची बाब आहे. ते सामूहिक व एकत्रित जबाबदारीच्या संकल्पनेला महत्त्व देत नाही. याविरुध्द काही लोकांना सामूहिक उत्कर्ष सर्वाधिक मोलाचा वाटतो व वैयक्तिक उन्नतीकडे ते विशेष लक्ष देत नाही. हे दोन्ही दृष्टिकोन चुकीचे असून वास्तविकतेला धरून नाहीत. इस्लाम व्यक्ती व समष्टीत संतुलन कायम करू पाहतो. इस्लाम व्यक्तीच्या स्वतंत्र अस्तित्वातः विश्वास करतो व प्रत्येकास अल्लाहसमक्ष जबाबदार व उत्तरदायी मानतो. इस्लाम वैयक्तिक हक्क बहाल करतो व इतरांना त्या हक्कात हस्तक्षेप करण्याची मनाई करतो. इस्लाम एका व्यक्तीच्या यथायोग्य उत्थानाला शैक्षणिक योजनेचा मुख्य उद्देश मानतो. व्यक्तीचे व्यक्तित्व समाज व संस्थानात पूर्णतः विलीन झाले पाहिजे या धारणेला इस्लाम मान्यता देत नाही. पवित्र कुरआननुसार,

"मनुष्याला तेच प्राप्त होते ज्याकरिता तो प्रयत्न करतो." *(सूरह अन्नज़्म : ३९)*

"निश्चितच अल्लाह कोणत्याच समाजाच्या अवस्थेत तोवर परिवर्तन घडवून आणीत नाही जोवर समाज स्वत: आपली दशा बदलण्याचा प्रयत्न करीत नाही." *(सूरह दहर : ११)*

अल्लाह व्यक्तीच्या क्षमतेपेक्षा जास्त जबाबदारीचे ओझे टाकीत नाही. प्रत्येक व्यक्तीने प्राप्त केलेल्या पुण्याचा त्याला मोबदला दिला जाईल व त्याने केलेल्या दुष्कर्माची फळे त्याला भोगावी लागतील." *(अल्बकरा : २८६)*

"आम्हाला आमच्या कर्मांचा मोबदला मिळेल व तुम्हाला तुमच्या कर्माचा."
*(अल्बकरा : १३९)*

कुरआनातील उपरोक्त श्लोकांनी सिध्द होते की इस्लाम विद्यार्थ्यांच्या व्यक्तिमत्त्वाला विशेष चैतन्य देऊ इच्छितो व त्यांच्या सर्व सुप्त गुणांना जागृत करू पाहतो व अशा प्रकारे त्याला समाजातील एक जबाबदार नागरिक बनविण्याचा प्रयत्न करतो जेणेकरून तो आपल्या सामाजिक जबाबदाऱ्या योग्यरित्या पार पाडू शकेल.

**ड) ज्ञानाची एकरूपता व समरसता**

शिक्षणाचे आणखी एक महत्त्वाचे तत्त्व आहे. ते म्हणजे त्याद्वारे विद्यार्थ्यांना संतुलित व समान दर्जाचे ज्ञान प्राप्त व्हावे. शिक्षणाद्वारे त्याला जगाच्या विविधतेत मानवी जीवन व विश्वाच्या परस्परसंबंधाची जाणीव होऊ लागेल. इस्लाम समन्वयवादी आहे व संतुलित व्यक्तिमत्त्व निर्माण करून त्याचा उध्दार करणे त्याचे ध्येय आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले आहे की विचार व आचार या दोहोंचे संतुलन प्रेषितत्वाचे वैशिष्ट्य आहे. म्हणून विद्यार्थ्याने कोणत्याही विशेष ज्ञानाचे क्षेत्र निवडण्यापूर्वी त्याचा विस्तार व जीवनाच्या समस्यांशी त्याचे संबंध याबाबतचे निश्चित स्वरूप जाणून घेणे आवश्यक असते.

इस्लामी दृष्टिकोनानुसार ज्ञानाचे लक्ष्य एकच असून ते अत्यंत परिपूर्ण असते. या विधानांची सत्यता यावरून लक्षात येते की सर्व ज्ञानांचे स्त्रोत कुरआन आहे. या ग्रंथात ज्ञानपिपासा असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला हवे ते मार्गदर्शन मिळते व ज्ञानाचे कोणत्याही क्षेत्राची त्याने निवड केली असली तरी त्याला योग्य दिशा प्राप्त होते. या वास्तविकतेमुळे मनुष्य सहजच एकत्वाकडे ओढला जातो.

परिणामत: मुस्लिम ज्ञानाच्या विविध शाखांना एकमेकांपासून दूर जाऊ देणार नाही. उलट संपूर्ण ज्ञानाला सलग्न व एकत्रित स्वरुप प्राप्त होईल. अशा प्रकारे विखुरलेल्या घटकांचे प्रस्थ कमी होऊन त्यांच्यातले दोष नष्ट होतील. ही बाब उच्च शिक्षणाची विशेष शाखा निवडताना निर्माण होते. सुरवातीच्या शिक्षणात निवडीचा प्रश्न निर्माण होत नाही. या शिक्षणपध्दतीने युवकांमध्ये विशाल दृष्टिकोन निर्माण होऊन त्यांच्यात आत्मीयतेचे संबंध निर्माण होणे शक्य होते.

### ह) चारित्र्याची घडण

शिक्षणाचे सर्वात महत्त्वाचे कार्य म्हणजे विद्यार्थ्यांचे चारित्र्य घडविणे. जोपर्यंत शिक्षणाद्वारे विद्यार्थी चारित्र्यवान होत नाही तोपर्यंत शिक्षणाचा मूळ उद्देश सफल झाला असे म्हणता येणार नाही. इस्लाम सदाचारास अग्रस्थान देतो. कुरआनात श्रध्दा व सत्कर्माला सर्वाधिक महत्त्व देण्यात आले आहे. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मानवाच्या विचार व आचाराना पावित्र्य प्राप्त करून देण्यावर भरच नव्हे तर प्राथमिकता दिली आहे.

मानसशास्त्रानुसार चारित्र्यघडणाचे परिणाम आरंभकाळातच दिसू लागतात. शाळा व कॉलेजचा चारित्र्यनिर्मितीच्या कार्यात सिंहाचा वाटा असतो. शिक्षणाद्वारे विद्यार्थ्याच्या स्वभावाला विशिष्ट स्वरूपात साचेबंद करता येते.

इमाम गज़ाली (रह) यांचे वक्तव्य आहे,

''विद्यार्थ्यांनि शिक्षणाद्वारे केवळ बौध्दिक क्षुधा न भागविता आपले नैतिक व सामूहिक जीवन ही परिमार्जित करायला हवे.''

प्रेषित मुहम्मद (स.) यांचे आदर्श जीवन आमच्या समक्ष आहे.

कुरआनात म्हटले आहे,

''तुमच्यासाठी प्रेषित मुहम्मद (स.) यांचे अतियोत्तम आदर्श चरित्र तुमच्या समक्ष आहे.''

*(सूरह अहजाब : २१)*

शिक्षणाकरिता अभ्यासक्रम तयार करताना प्रत्येक क्षेत्रात प्रेषित मुहम्मद (स.) व त्यांच्या सोबत्यांच्या चारित्र्याचे दर्शन विद्यार्थ्यासमोर मांडायला हवे. इतकेच नव्हे तर शिक्षकाने स्वत:च्या चारित्र्य व कर्मानि विद्यार्थ्यांना प्रभावित करून चारित्र्यवान होण्यास प्रोत्साहित करायला हवे. या कामी विद्यालयाचे वातावरणसुध्दा शुध्द व सुव्यवस्थित व्हायला हवे.

## परिपूर्ण जीवन

इस्लाम जीवनाचा आनंद उपभोगण्यापासून अलिप्त राहण्याची शिकवण देत नाही. उलट त्याचा पुरेपूर भोग घेण्याचा आदेश देतो. इस्लाम युवकांना जीवन योग्यरित्या व्यतीत करण्याचे प्रशिक्षण देऊन समाजाच्या सर्वांग समृध्दीसाठी कार्यरत होण्यास प्रेरित करतो.

इस्लाम संन्यास तत्त्वाचा विरोध करतो. इस्लाम लोकांना मानवी जीवनाच्या ओढाताणीला झुंज देऊन सत्य व न्यायाच्या मार्गानि जगण्याचे आदेश देतो. कुरआन आम्हास ऐहिक व मरणोपरांत जीवनाचे यशप्रद शिक्षण देतो. कुरआनने लोकांना अल्लाहने प्रदान केलेल्या आनंद व सुखसमृध्दीपासून अलिप्त राहणाऱ्या व्यक्तीपासून सावध केले आहे.

''सांगा त्या लोकांना की त्यांनी कोणाच्या आदेशाने अल्लाहने निर्माण केलेल्या खाद्य

पदार्थ व आनंददायी जीवनोपयोगी वस्तूपासून अलिप्त राहण्याचा निर्णय घेतला आहे.''

*(सूरह अल अहराफ : २)*

उपरोक्त श्लोकावरून इस्लामचा दृष्टिकोन अगदी स्पष्ट आहे.

''खा, प्या मात्र मर्यादा ओलांडू नका.'' *(सूरह अहराफ :३१)*

इस्लाम मानवी काबाडकष्टाचे कौतुक करतो. इस्लाम प्रत्येक माणसास धनार्जन करण्यास समर्थ बनवितो.

प्रत्येक व्यक्तीने प्रामाणिकपणे व न्यायबुध्दीने योग्य त्या मार्गाने धनार्जन करावे, असे शिक्षण देण्यात यावे. शिक्षणाद्वारे समाजाला आर्थिक, सामाजिक, वैज्ञानिक व कलाकौशल्याच्या क्षेत्रात प्राविण्य प्राप्त करून घ्यायला हवे. या गरजा पुरविण्याबाबतीत दुर्लक्ष न करता शिक्षणाद्वारे त्यांच्या पूर्ततेसाठी भरीव प्रयत्न करण्याची गरज आहे. निश्चितच शिक्षणाने प्रत्येक व्यक्ती उदरनिर्वाह करण्यास समर्थ होते.

या उद्देशाची पूर्तता झाल्यास इस्लामी शिक्षणपध्दतीचे आदर्श स्वरुप सिध्द होईल व ते निश्चितच मानवजातीकरिता वरदान सिध्द होईल.

## शिक्षणाचे ऐतिहासिक स्वरुप

आम्ही ज्ञान व शिक्षणाबाबत इस्लामी दृष्टिकोन व्यक्त केला आहे. इतिहासाच्या प्रत्येक काळात मुस्लिमांनी शिक्षण व्यवस्थेच्या मूलभूत तत्त्वांची पूर्तता केल्याचे निदर्शनास येते. कधी कार्यप्रणालीत भिन्नता दिसते तर व्यवस्थेच्या नियमांतही फरक दृष्टिगोचर होता. संस्थांचे स्वरुपही बदलत गेले असेल. मात्र मूलभूत उद्देश व प्राप्त परिणामांचे स्वरुप स्थिर राहिले आहे.

## प्रेषितकालीन शिक्षणव्यवस्था

प्रेषित मुहम्मद (स.) इस्लाम धर्मियांचे पहिले शिक्षक होते. त्यांनीच मदीना शहरात पहिली सुसज्ज शाळा स्थापित केली होती. सफा नावाच्या चबुतऱ्यावर पहिली शाळा स्थापित झाली होती व 'सफाचे साथी' त्यातील विद्यार्थी होते. विद्यार्थ्यांची संख्या जवळपास ७० / ८० असेल. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याव्यतिरिक्त इतर साथीदार शिक्षकांचे कर्तव्य पार पाडीत असत. सफाच्या साथीदारांपैकी आदरनीय मआज बिन जबल (र.) आर्थिक व्यवहार पाहत असत. तेच देणग्यांचे वाटप करीत असत. इतर साथीदारांना अन्य जबाबदाऱ्या सोपविण्यात आल्या होत्या. त्याच साथीदारांना ज्ञानार्जन व प्रचारकार्यासाठी परदेशी पाठविण्यात येत असे. त्यापैकी बरेच साथी आपला खर्च भागविण्यासाठी स्वत: कष्ट करून धनार्जन करीत. काही श्रीमंत मुस्लिम त्या विद्यार्थ्यांची व त्यांच्या नातेवाईकांची भरपूर आर्थिक मदत करीत असत. याच पाठशालेने इस्लामी राज्यात शिक्षणव्यवस्था कायम केली व तीच व्यवस्था पुढे चालू राहिली.

त्या पाठशालांची कार्यपध्दती पुढे दिली आहे.

१) सर्वप्रथम धार्मिक शिक्षण देण्यात यावे. कुरआन व प्रेषितांच्या शिकवणीला शिक्षणाचे केंद्रस्थान मानले जावे.

२) विद्यार्थ्यास चांगला मुस्लिम व एक चांगला प्रचारक बनवावा.

३) प्रेषित मुहम्मद (स.) यांनी मशीद व शिक्षणाचा संबंध कायम केला होता. मशीद धर्माचे केंद्रस्थान, राजकारणाचे केंद्र व शिक्षणासाठी पाठशाला बनली होती. अशा प्रकारे विद्यार्थी एका विशेष परिपूर्ण संस्कृतीचे वारस झाले होते.

४) विद्यार्थ्यांनी स्वत: मेहनत करून आपल्या गरजा भागविणे व विविध कलाकौशल्याची कामे शिकावी व त्यांचा वापर करावा अशी अपेक्षा करण्यात येत असे.

५) शिक्षणाची जबाबदारी स्वत: मुस्लिम समाजावर व इस्लामी राज्यावर सोपविण्यात आली होती. या उद्देशाच्या पूर्ततेसाठी त्यांनी आपल्या उत्पन्नाचा उपयोग करावा व मुस्लिम समाज व राज्याचे उत्पन्न व कोषागारातील संपत्तीतून सर्वप्रथम विद्यार्थ्यांच्या शिक्षणावर खर्च करण्यात यावा.

## प्रेषितानंतरचा काळ

प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या प्रेषित्वाच्या काळात ज्या प्रकारच्या शिक्षणव्यवस्थेची सुरुवात झाली, त्याच धरतीवर तिचा विकास होत गेला. मशिदी ज्ञानकेंद्रे झाली. प्रत्येक ठिकाणी कुरआन व प्रेषितांच्या उपदेशा (हदीस) चे पाठ देण्यात येऊ लागले. प्रत्येक मशिदीत अनेक गटचर्चा होऊ लागल्या. प्रत्येक गटात हजारो विद्यार्थी भाग घेत. जे शिक्षक सधन होते ते स्वत:चा खर्च स्वत:च भागवीत. मात्र जे आर्थिकदृष्ट्या दुबळे होते त्यांना शासकीय तिजोरीतून अर्थसहाय्यं मिळत असे. खलीफांनी (राज्यकर्त्यांनी) तर मासिक वेतन वा अनुदान निश्चित करून टाकले होते. प्रत्येक मशीद एक पाठशाला व प्रत्येक मैदान एक कार्यशाळा झाली होती. पहिल्या चार शतकांपर्यंत हीच व्यवस्था कायम राहिली. त्या स्वतंत्र पाठशाला नसल्या तरी व्यवस्था इतकी समाधानकारक व सुचारू होती की घरोघरी ज्ञानाचा प्रसार होत गेला व मिळणारे ज्ञान समसमान व सर्वग्राही होते. 'इस्माए-रिजाल' या ग्रंथात जवळपास पाच लाख विद्वानांबाबत संपूर्ण तपशील दिला गेला आहे. तत्कालीन पाठशालांमध्ये मशीदीना केंद्रस्थान प्राप्त होते. त्यामुळे मशिदींवर बांधकामकलेची छाप दिसून येते. तिन्ही बाजूला प्रवेशद्वार असणे व मशीदीस जोडून निर्माण केलेल्या अनेक खोल्यावरून या सत्याची पुष्टी होते की तेथे पाठशालेतील गुरु व शिष्यांकरिता निवासाची विशेष सोय करण्यात आली होती. तत्कालीन महत्त्वाच्या ज्ञानकेंद्रापैकी ट्युनिसचे 'जामे जैतून' व इजिप्तचे 'जामे अझहर' आज ही अस्तित्वात आहेत. मशिदीशिवाय दर्वेशांचे आश्रमस्थान व विद्वानांची घरे तसेच प्रशस्त

मैदानही ज्ञानप्रसारासाठी उपयोगात आणले जात होते व लाखो विद्यार्थी मोफत ज्ञानार्जन करीत होते.

हा मुस्लिमांच्या शैक्षणिक व्यवस्थेच्या पहिला काळ होता. दुसऱ्या काळाचा आरंभ पाचव्या शतकात झाला. या काळात मशिदीशिवाय स्वतंत्र पाठशाळांची मोठ्या संख्येत स्थापना करण्यात आली. सुलतान महमूद गजनवी यांने आपल्या राज्याची राजधानी गझणी येथे स. १०१९ (हि. स. ४१०) मध्ये पहिली इस्लामी पाठशाळा निर्माण केली. अबुल कासम फरिश्ता याच्या पुस्तकानुसार मशिदीला लागून एक भव्य पाठशाळा उभारली गेली होती व त्या पाठशाळेच्या ग्रंथालयात दुर्लभ ग्रंथाचा संग्रह करण्यात आला होता. मशीद व पाठशाळेच्या खर्चासाठी सुलतानचे अनेक गांव वक्फ (इनाम) केले होते. (तारीख ए-फरिश्ता, खण्ड १ - हालात सुलतान महमूद गझनवी) महमूद गझनवीने आपल्या साम्राज्यात बेसुमार पाठशाळा कायम केल्या होत्या व त्याच्या अधीन असलेल्या अनेक मात्तब्यर वरिष्ट हुद्यावरील अधिकारी व धनवान व्यक्तींनीसुध्दा अनेक शिक्षणसंस्था उभारल्या होत्या. महमूद गझनवीला हल्लेखोर म्हणून ओळखले जाते मात्र ज्ञानाच्या क्षेत्रात त्यांने केलेल्या क्रांतिकारक उदात्त कार्यांचा कोणीही उल्लेख करीत नाही, हा इतिहासाने त्याच्या बाबतीत केलेला घोर अन्याय आहे.

दुसरा उल्लेखणीय मदरसा (पाठशाळा) मदरस-ए-निज़ामिया बगदाद येथे सन हिजरी ४८५ मध्ये सलजोकिया खानदानचे प्रसिध्द प्रधानमंत्री निज़ामुल-मुल्क तूसी यांनी कायम केला होता. त्याच पाठशालेत इमाम हरमैन व इमाम गज़ालीसारखे प्रख्यात विद्वानांनी शिक्षक म्हणून सेवा करून अविस्मरणीय ऐतिहासिक कार्य केले आहे.

त्यानंतर अनेक पाठशाळा उभारल्या गेल्या व संपूर्ण इस्लामी शिक्षणक्षेत्रात जाळे पसरले गेले. त्यात असे काही भव्य व विशाल विद्यापीठ होते ज्यांच्या अधीन अनेक छोट्या छोट्या पाठशाळा अस्तित्वात होत्या. त्या विशाल पाठशाळांना आजच्या भाषेत आपण युनिव्हर्सिटी संबोधू शकू. त्या सर्व पाठशाळांमध्ये उपरोक्त अभ्यासक्रम लागू होता. मोफत शिक्षणाची इतकी भव्य व उदात्त व्यवस्था इतर कोणत्याच संस्कृतीत अस्तित्वात असल्याचे आढळून येत नाही.

## आशिया खंडात शैक्षणिक उत्कर्षाचा इतिहास

इस्लामचा संदेश भारतात प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या प्रेषित्वाच्या काळातच पोहचला होता व खिलाफते राशिदाच्या (चार आदर्श खलिफा) काळातही प्रचारकार्य चालू होते. नंतर बनू उमैय्याँच्या काळात मुहम्मद बिन कासिम यांनी बराच मोठा भूभाग काबीज केला व इस्लामी राज्याची स्थापना केली. या काळात शिक्षणाचा चांगलाच प्रसार झाला. त्या क्षेत्रातील लोकांच्या जीवनावर व एकूण संस्कृतीवर खोलवर परिणाम झाला. दुर्दैवाने इस्लामी राज्य फार काळ टिकू शकले नाही. नंतर महमूद गजनवीने खैबर ते सोमनाथपर्यंत

सतत सैनिक हल्ले केले. नंतर मोअज्जुद्दीन मुहम्मद बिन साम यांनी इस्लामी राज्याची स्थापना केली. कुतुबुद्दीन ते बहादुरशाह झफरपर्यंत साडेसातशे वर्षे मुस्लिमांनी राज्य केले व त्यांनी इस्लामी शिक्षणव्यवस्थेची चांगली प्रगती घडवून आणली. तत्कालीन शिक्षणव्यवस्थेचे तपशील पुढे दिले आहे.

१) भारतात बऱ्याच पाठशाळा सुरवातीलाच अस्तित्वात आल्या. मात्र शिक्षण केवळ पाठशाळांपर्यंत मर्यादित राहिले नाही. सुरवातीला घरोघरी शिक्षण दिले जात होते. विशेषत: मुलींना घरातच शिक्षण दिले जात होते. पारंपरिक शिक्षणपध्दतीनुसार मशीद हे शिक्षणाचे केंद्र बनून राहिले. इस्लामी विद्वानांच्या घरांनासुध्दा शिक्षणाच्या केंद्राचे स्वरुप प्राप्त झाले होते. ग्रंथालय केवळ ग्रंथालय न राहता ज्ञान प्रसारालये झाली होती. इतिहासात शैक्षणिक चर्चासत्रांचाही उल्लेख आढळून येतो.

२) जरी शिक्षणात इस्लाम धर्माच्या शिकवणींना प्राथमिकता दिली जात असली तरी इतर आवश्यक ज्ञानाच्या बाबींकडे कधीच दुर्लक्ष करण्यात आले नाही. कारखान्यांमध्ये औद्योगिक प्रशिक्षण दिले जात होते. व्यापारसंबंधी ज्ञानर्जनाची व्यवस्था वाणिज्य शाळांत करण्यात येत होती व तेथे गणित व व्यापारासंबंधीचे प्राथमिक शिक्षण दिले जात होते. सैनिक शिक्षणसंस्थाही अस्तित्वात होत्या. लेखन, पत्रकारिता, चित्रकला, शिल्पकला, मातीची सुंदर भांडी तयार करणे, बांधकाम इत्यादी कलाकौशल्याच्या सर्व प्रकारच्या कामांच्या प्रशिक्षणाची व्यवस्था केली जात असे. अशा प्रकारच्या संस्थांचा इतिहासात उल्लेख आढळून येतो. यावरून त्या काळात शिक्षणाची अत्यंत समाधानकारक व्यवस्था होती असे लक्षात येते.

तत्कालीन शिक्षणव्यवस्थेत एका बाजूस कुरआनच्या आधारावर इस्लामी शिक्षण दिले जात होते तर दुसऱ्या बाजूस वैद्यकीय, गणित व भूगोलाबाबतचे शिक्षण देण्याची व्यवस्था केली जात होती. मौलाना मनाजिर अहसन गिलानी यांनी म्हटले आहे की तत्कालीन अभ्यासक्रमाने त्यांना इस्लामी राज्यासाठी 'सिव्हिल सर्विसेस'ची निर्मिती करावयाची होती. विशेषत: प्रशासन व न्यायालयीन व्यवस्था कायम करणे हा मुख्य उद्देश होता. शिक्षणव्यवस्थेद्वारा लोकांना जीवनाचे प्रत्येक कार्य इस्लामी पध्दतीने पार पाडले जावे व त्याचबरोबर इतर कामेही कौशल्याने करण्यासाठी आवश्यक प्रशिक्षणाचीही व्यवस्था करण्यांत यावी अशी योजना होती. याबाबत औरंगज़ेब यांनी त्यांच्या शिक्षण सल्लागाराशी केलेल्या चर्चेचा उल्लेख करता येईल. औरंगज़ेब यांनी म्हटले होते, ''माझ्या राज्यातील जनतेच्या विविध रूढीरिवाजांबाबत मला माहिती पुरविणे

माझ्या सल्लागारांचे कर्तव्य आहे. मला माहीत व्हायला हवे की माझ्या जनतेसमोर कोणत्या समस्या आहेत व ते किती समर्थ आहेत? त्यांचे आचरण, रूढी-परंपरा, धर्म व शासनपध्दत, युध्दनैपुण्य आदींबाबत तपशील व कोणत्या गोष्टीत त्यांना अधिक रूची आहे याबाबत मला माहिती हवी आहे. हे शिक्षणाद्वारे लोकांना समजून सांगण्यात यावें की राज्यशासनाची सुरुवात कशी झाली व समाजाची उन्नती व अधोगतीची कारणे काय आहेत? त्या कोणकोणत्या सबबी, कृत्य व घटना आहेत ज्यामुळे भव्य परिवर्तन व सशक्त क्रांती घडून येत आहे?''

३) त्या काळांत ज्या प्रमाणात शिक्षणाचा प्रसार झाला होता त्यांची आज कल्पनाही करता येत नाही. मुस्लिमांच्या आगमनाच्या केवळ शंभर वर्षांच्या काळात शिक्षणाचा जबरदस्त प्रचार झाला होता. त्या काळात भारतात केवळ पंडितानाच शिक्षण प्राप्त करता येत होते. एखाद्या शूद्राच्या कानांत धर्मग्रंथाचे शब्द पडल्यास त्यांच्या कानांत वितळलेले तप्त शिसे ओतले जात असे. (त्यामुळे बहुसंख्य लोक अशिक्षित राहत असत.) इस्लामी राज्य स्थापन झाल्यानंतर सर्वत्र इस्लामी शिक्षणाची चर्चा होऊ लागली. संपूर्ण भारतवर्षात शिक्षण व कलाकौशल्याचा प्रसार होत गेला. सुलतान मुहम्मद तुघलक (७२५ ते हि. स. ७५२ अर्थात १३२४ ते १३५१ इ. स.) च्या काळाबाबत मकझीरचे कथन आहे,

''सुलतान मुहम्मद तुघलकच्या राज्यात दिल्ली शहरात जवळपास एक हजार मदरसे (पाठशाळा) होते. शिक्षकांना शासकीय कोषागारातून वेतन दिले जात होते. दरबारातील दासीही कुरआन मुखोद्गत करीत. मदरस्यामध्ये धार्मिक शिक्षणासह तत्त्वज्ञान व गणिताचे ज्ञान दिले जात असे.''

*(कितबुल खतत मकरीझी, खंड ३, पृ. १२४)*

दिल्ली शहरात एक हजार मदरसे (पाठशाळा) होते. याबाबत 'सुबहल अअशा'चे लेखक फलकराझी देखील साक्ष देतात. (खंड ५, पृ. ६६) या शाळा साधारण पाठशाळा नव्हत्या. त्यापैकी काही शाळा आजकालच्या युनिव्हर्सिटीइतक्या विशाल होत्या. सुप्रसिध्द इतिहासकार झियाउद्दीन बर्नी याने फिरोजशाहच्या काळाबाबत लिहिले आहे,

''दिल्लीच्यां या पाठशालांचे वैभव, सुंदर इमारत, महाल व विश्रामगृह, सुव्यवस्था व उत्तम अभ्यासक्रम वगैरे सर्व गोष्टी खरोखर वाखाणण्यालायक होत्या. शाळेच्या खर्चासाठी शासनाकडून अनुदान दिले जात असे. मदरस-ए-फिरोजशाहीची इमारत इतकी सुंदर होती की इतर कोणतीही इमारत तिची

बरोबरी करू शकत नव्हती. एका विशाल उद्यानातील जलाशयाच्या काठी ती उभारली गेली होती. शेकडो विद्यार्थी तेथे कायम राहत असत. त्यांच्याकरिता वस्तीगृहाची व्यवस्था करण्यात आली होती. बगीच्यातील झुडुपांच्या सावलीत संगमरवरी दगडाच्या शुभ्र लाद्यावर विद्यार्थी मनसोक्त लोळत व आनंद घेत असत.''

*(संदर्भ : 'हिंदुस्थान में कदीम इस्लामी पाठशाळा')*

औरंगजेब यांच्या काळात सुप्रसिध्द कॅप्टन अलेक्झॅडर हेमल्टन आपल्या प्रवासवर्णनात लिहितात, सिंधच्या ठ्ठा शहरात विविध विषय व कलाकृतीच्या जवळपास चारशे शैक्षणिक संस्था होत्या. केवळ ठ्ठा या शहरातच नव्हे तर इतर शहरातही अशीच परिस्थिती होती. इस्लामी शासनकालात सर्वत्र शिक्षणाची हीच व्यवस्था होती. उच्चदर्ज्याचे शिक्षण प्रत्येक शहरात, गाव-खेड्यातच नव्हे तर प्रत्येक मोहल्ल्यातील घराघरात दिले जात होते.

आजच्या वैश्विक शिक्षणापेक्षा तत्कालीन शिक्षणाचा दर्जा निश्चितच उच्च पातळीचा होता.

४) मुस्लिमांच्या शिक्षणाचे वैशिष्ट्य म्हणजे ते सार्वजनिक होते. शासनाकडून शिक्षणाच्या प्रसारासाठी भरपूर आर्थिक मदत मिळत असे, तसेच आवश्यक त्या सर्व सोयी उपलब्ध करून दिल्या जात. मात्र शिक्षणावर सरकारचे कधीच नियंत्रण नव्हते. कोणत्याच सरकारी खात्याकडून शैक्षणिक संस्थावर नियंत्रण ठेवले जात नव्हते. दिल्लीचे सुलतान व नंतर मोगल सम्राटांच्या शासनकालात 'सदललसदर' या पदनामाच्या हुद्याचा उल्लेख आढळतो. या अधिकाऱ्यामार्फत समाजाच्या शैक्षणिक व नैतिक समस्यांवर नाममात्र नियंत्रण ठेवले जात होते. मात्र शैक्षणिक स्वातंत्र्यावर त्याचा जरासुध्दा दुष्परिणाम घडून येत नव्हता. अभ्यासक्रमावरही शासकीय नियंत्रण नव्हते. या खात्यामार्फत निष्णात बुध्दिमान युवकांची निवड करून त्यांच्यावर न्याय व जटिल समस्या निवारण करण्याची जबाबदारी सोपविण्यात येत असे. प्रत्येक शाळा आपापल्या ऐपती व मर्जीनुसार शिक्षणव्यवस्था कायम करण्यास मोकळी होती. एवढेच नव्हे तर ज्या शाळा शासकीय खर्चाने उभारल्या जात होत्या, तेथील शिक्षकांना पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त होते. एखाद्या विद्वानाने शिक्षणाच्या सुधारणेसाठी नवा प्रस्ताव मांडल्यास तो शैक्षणिक संस्थाकडून स्वीकारला जात असे, मात्र त्याकरिता शासनाकडून सक्ती वा जबरदस्ती केली जात नसे. आश्चर्याची बाब म्हणजे इतके स्वातंत्र्य असूनही शैक्षणिक व्यवस्थेत असाधारण समानता व एकरूपता दिसून येत असे. यावरून सिध्द होते की इस्लामी संस्कृतीची

समाजावर इतकी मजबूत पक्कड होती की शिक्षणात स्वाभाविकरित्या समानता निर्माण झाली होती. अशा प्रकारची स्वाभाविक एकरूपता जगाच्या कोणत्याच संस्कृतीत वा समाजात आढळून येत नाही.

ग्रीसमध्ये स्वातंत्र्य होते, मात्र तेथे शिक्षणाला बौध्दिक व्यायामांचे स्वरूप दिले होते. चीनमध्ये ठराविक वंशाचे व शासनव्यवस्थेचे शिक्षणावर कडक नियंत्रण होते. हिंदू संस्कृतीत शिक्षणव्यवस्थेचा अभाव होता. मुस्लिम शासनव्यवस्थेने शिक्षणास प्रोत्साहन देऊन शिक्षणव्यवस्थेचे स्वातंत्र्य अबाधित ठेवले. शिक्षक हाच शिक्षणाचा केंद्रबिंदू होता व सशक्त नैतिक सामर्थ्य शिक्षणाची सुव्यवस्था कायम राखण्यास पुरेसे होते. हे खरोखर एक दुर्लभ चित्र निदर्शनास येते. याचे एकमेव कारण होते इस्लामचा विशिष्ट स्वभावगुण, मानवी आदर, व्यक्तीस्वातंत्र्य, मरणोपरात न्यायनिवाड्याची जाणीव व जगात कुठेही अस्तित्वात नसलेली इस्लामी लोकशाही व्यवस्था.

५) एका बाजूला (शैक्षणिक) स्वातंत्र्य होते तर दुसऱ्या बाजूस शासकीय धोरण शासन शिक्षणाला सर्वाधिक महत्त्व देत होते. याचे प्रमाण निजामुल्मुल्क तूसीने मालिक शाह सलूकीला दिलेल्या उत्तरावरून मिळते. एकदा असे झाले की शासकीय तिजोरीतील फार मोठी रक्कम शिक्षणव्यवस्थेवर खर्च झाली. शाहने चिंतित होऊन म्हटले की इतक्या रकमेने तर एक सुसज्ञ सैन्य तयार झाले असते. निज़ामुल्मुल्कने उत्तर दिले, ''हे राजा! तुझ्या सैनिकांच्या धनुष्यातील बाण तर काही अंतरापर्यंतच पोहचू शकतात, मात्र जी फौज मी तयार करीत आहे तिचे बाण संपूर्ण धरती व आकाशापर्यंत पोहचू शकतील आणि त्यांच्या प्रार्थना व पावित्र्याच्या बाणांना आकाशही अडवू शकणार नाही.'' राज्यकर्ते शिक्षणाला व्यापार समजत नव्हते व त्यावर होणाऱ्या खर्चास तिजोरीवर पडणारा भारही मानत नव्हते. त्यांना विश्वास होता की हे कार्य ऐहिक व मरणोपरांत जीवनात यश प्रदान करणारे आहे.

कुतुबुद्दीन ऐबकपासून बल्बनपर्यंत सुलतानांनी मोठ्या संख्येत मदरसे व मशिदींचे निर्माण केले. फिरोजशाहच्या वार्षिक अंदाजपत्रात १३६ लाख तनका (तत्कालीन नाणे) अनुदानाची तरतूद होती. त्यातील २५% अनुदान केवळ शिक्षणाच्या प्रसाराकरिता होते. त्याने ३० विद्यापीठे व एक विश्वविद्यालय दिल्लीत कायम केले होतें व संपूर्ण खर्च सरकारी तिजोरीतून केला गेला होता. बहमणी व दक्षिण भारतातील इतर राज्यांकडूनही शिक्षणावर भरपूर रक्कम खर्च केली जात होती. मुगलांच्या सत्तेच्या काळातील शहेनशाहांनी शिक्षण क्षेत्रात एकमेकांपेक्षा अधिक चांगली भूमिका बजावली. शहंशाह जहाँगीरबाबत

इतिहासकार जहानेजहाँने नमूद केले आहे,

"त्याने तीस वर्षांपेक्षा अधिक काळापासून बंद असलेल्या पक्षी व प्राण्याचे आश्रयस्थान बनलेल्या शाळांच्या इमारतींचे पुनर्निर्माण केले व त्यांना पुन: पूर्ववत अस्तित्वात आणले. जहाँगीरने शिक्षणावर जबरदस्त खर्च केला. मिस्टर एच. जी. केन यांनी म्हटले आहे, "त्याने बेसुमार विद्यापीठे व शाळा सुरु केल्या."

मुहम्मद शाह (ज्यास इतिहास रंगीला नावाने ओळखतो) हा शिक्षणावर बेफाम खर्च करीत असे. हजरत शाह वलीउल्लाह देहलवी यांच्या 'दारूलउलूम'च्या निर्मितीचे श्रेय त्यालाच द्यायला हवे.

असे होते मुस्लिम राज्यांचे शिक्षणप्रेम. याच प्रकारची कामगिरी दरबारातील उच्चपदस्थ जमीनदार, जागीरदार व धनीमानी लोकांनी बजावली.

मौलाना गुलाम अली आजाद बलग्रामी अवधप्रांत, यांच्याबाबत इतिहासकार म्हणतो,

"संपूर्ण अवध व अलाहबाद प्रांतात प्रत्येक दहा ते तीस मैलाच्या अंतरावर धनवान व उच्चवर्गाच्या लोकांची वसाहत आहे. ते सुलतान व अधिकाऱ्यांच्या वतीने जागीर सांभाळण्याचे कार्य करीत असतात. त्यांनी मशीदी, पाठशाळा व धर्मशाळा बांधल्या आहेत. विद्वान शिक्षक सर्वत्र ज्ञानदानाचे कार्य करीत आहेत. त्यांनी सर्वत्र ज्ञानलालसेचे वातावरण निर्माण करून ठेवले आहे. विद्यार्थ्यांचे घोळके व फौजांच्या पलटणी एका शहरातून दुसऱ्या शहराकडे जात आहेत व संधी मिळेल तिथे ज्ञानार्जन करीत आहेत. धनीमानी लोक त्यांची देखभाल करीत व त्या कार्यास पुण्यकार्य मानीत. शाहजहाँ (दुय्यम) अनारुल्लाह बुरहाना म्हणतात, "पूर्वेत माझी राजधानी शीराज़ समान आहे."

*(संदर्भ मुल्ला निज़ामुद्दीन सुहारबी यांचे पुस्तक 'मुतबा मुफीदे आप', पृ. २२३)*

६) आणखी एक विशेष बाब अशी की शिक्षण नेहमीच मोफत देण्यात आले. भारतात केवळ शिक्षण मोफत नव्हते तर भोजन व निवासाची व्यवस्था (लॉजिंग व बोर्डिंग) देखील विनामूल्य होती. गरीब विद्यार्थ्यांना खर्चासाठी सरकार व धनवानांकडून शिष्यवृत्ती दिली जात असे. काही शाळांमध्ये तर मोठ्या थाटामाटात व्यवस्था केली जात असे. मदरसे व मशीदींमध्ये निवासासाठी खोल्या बांधलेल्या आहेत.

७) तत्कालीन गुरु व शिष्यांमध्ये अत्यंत आत्मीयतेचे संबंध असत. शिक्षक शिक्षणाचा केंद्रबिंदू होते व शिष्यांकरिता ते शिक्षक व पालक. शिक्षक अत्यंत

चारित्र्यवान असत. त्यांच्या त्याग व तपस्येसोबत नैतिक व शैक्षणिक मिश्रणाने इस्लामच्या महिमेचे दर्शन होत असे. इस्लामने कसे व किती चारित्र्यवान व्यक्तद्ध निर्माण केल्या आहेत, हे लक्षात येते.

प्रसिध्द अध्यापक हकीम अली गीलानी यांनी शिक्षक व शिष्यांच्या संबंधाबाबत 'तझ्कर ए उलमाए हिंद'मध्ये म्हटले आहे,

''ते आपल्या शिष्यांना पाठ शिकवत व त्यांना सोबत घेतल्याशिवाय अन्नग्रहण करीत नसत.''

बिहारचे मुन्शी सदरुद्दीनने मल्कुल उल्मा मौलाना अब्दुल अली बहरुलउलूम यांना बरदवान येण्याचे आमंत्रण दिले होते व भरपूर आर्थिक मोबदला देण्याचे आश्वासन दिले होते. तेव्हा मौलानांनी उत्तर दिले होते, ''माझ्यासोबत शंभर शिष्य आहेत. त्यांच्या निवास व भोजनाची जोवर तेथे व्यवस्था होत नाही, माझे येणे शक्य नाही.'' शिष्यही आपल्या गुरूंशी अत्यंत आदरभावाने व आत्मीयतेने वागत. शिष्यांच्या प्रामाणिक व आज्ञाधारक वर्तनामुळे गुरु-शिष्यांचे आपसांतील संबंध अत्यंत सौहार्दपूर्ण असत.

८) अध्यापक केवळ शिष्याना शिक्षण देत नव्हते तर एकमेकांबद्दल प्रेम व आदराचे संबंध निर्माण करून त्यांचे वैचारिक व व्यावहारिक वर्तनात परिवर्तन व परिमार्जन घडवून आणीत. त्यांना त्यांच्या शैक्षणिक प्रगतीबरोबर त्यांच्या चारित्र्यात पावित्र्य व उच्चस्तर निर्माण करण्याची तळमळ लागून असे. ते चारित्र्यवान व चांगले मुस्लिम होऊन शाळेतून निघावेत, असे त्यांचे प्रयत्न असत. तत्कालीन समाजात संयम, विश्वास, लज्जा, सहानुभूती व बंधुभाव आदी सद्‌गुणांचे वातावरण निर्माण होण्याचे संपूर्ण श्रेय तत्कालीन शिक्षणास द्यायला हवे, कारण अध्यापनासोबत चारित्र्यनिर्मितीचे महान कार्य शिक्षणव्यवस्थेद्वारे यशस्वीरित्या पार पाडले जात होते.

९) तत्कालीन परिस्थितीचा अभ्यास करता शिक्षणव्यवस्था बंदिस्त नव्हती. बदलत्या परिस्थितीनुसार नवनव्या गरजांचे निराकरण करण्याचे प्रयत्न केले जात होते. शैक्षणिक संस्थातून शिक्षित होऊन निघालेले लोक चार भिंतीत बसून न राहता प्रशासकीय कामकाज पाहू लागत व अत्यंत शिताफीने कार्य करीत. जर वृक्षांची पारख त्यांच्या फळांवरून करता येते तर शिक्षणव्यवस्थेची पारख त्यात तयार होऊन बाहेर पडलेल्या चारित्र्यावान व कीर्तीवान व्यक्तींवरून करता येत नाही का!

*** समाप्त ***